महाराष्ट्रातील ऐतिहासिक, सामाजिक, शैक्षणिक, कला व क्रीडा क्षेत्रातील व्यक्तींच्या जीवनावर आधारित मराठी चित्रपट /माहितीपट / लघुपट यांना सहाय्यक अनुदान देण्याबाबत "छाननी समिती" व "निवड समिती" या समित्यांवर अशासकीय सदस्य नियुक्त करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: गोचिन-२०२४/प्र.क्र.५५/सां.का.१**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय (विस्तार), मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०७ एप्रिल , २०२५.

**वाचा :** १. पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२४/प्र.क्र.५५/ सां.का.१, दि. १४ ऑक्टोबर, २०२४.

२. व्यवस्थापकीय संचालक ,महाराष्ट्र चित्रपट ,रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ ,गोरेगाव ,मुंबई यांचे दि .२८ मार्च, २०२५ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना :**

उपर्निर्दिष्ट क्र.१ अन्वये, महाराष्ट्रातील ऐतिहासिक, सामाजिक, शैक्षणिक क्षेत्रातील महत्वपूर्ण ज्येष्ठ व्यक्तीच्या जीवनावर आधारीत पूर्ण लांबीच्या मराठी चित्रपट निर्मिती करण्यासाठी सहाय्यक अनुदान देण्याबाबत सुधारीत कार्यनियमावलीस मान्यता देण्यात आलेली आहे. तसेच सदर शासन निर्णयामध्ये छाननी समिती व निवड समिती या दोन समित्यांवर शासकीय सदस्यांची नियुक्तींना मान्यता देण्यात आलेली आहे.

आता, सदर योजनेंतर्गत निर्मितीसाठी अनुदान वितरीत करण्यास्तव छाननी समिती व निवड समिती या दोन समित्यांवर अशासकीय सदस्य यांची नियुक्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय**

महाराष्ट्रातील ऐतिहासिक, सामाजिक व शैक्षणिक कला व क्रीडा क्षेत्रातील व्यक्तींच्या जीवनावर आधारित मराठी चित्रपट / लघुपट / माहितीपट निर्मितीसाठी अनुदान वितरीत करण्याच्या अनुषंगाने "छाननी समिती" व "निवड समिती" मध्ये खालीलप्रमाणे अशासकीय सद्स्यांची नियुक्ती करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

**छाननी समिती**

| अ.क्र. | अशासकीय सदस्याचे नाव | पदनाम |
|---|---|---|
| १ | श्री. प्रमोद पवार | अशासकीय सदस्य |
| २ | श्रीमती तृप्ती भोईर | अशासकीय सदस्य |
| ३ | श्री. आदिनाथ कोठारे | अशासकीय सदस्य |

**निवड समिती**

| अ.क्र. | अशासकीय सदस्याचे नाव | पदनाम |
|---|---|---|
| १ | श्री. ऋषिकेश जोशी | अशासकीय सदस्य |
| २ | श्री. दीपक करंजीकर | अशासकीय सदस्य |

०२. दि. १४ ऑक्टोबर, २०२४ रोजीच्या शासन निर्णयातील समितीमधील शासकीय सदस्य पूर्वीप्रमाणे कायम राहतील व इतर सर्व बाबी या सदर शासन निर्णयास लागू राहतील.

०३. या समितीवरील अशासकीय सदस्यांना वित्त विभागाच्या प्रचलित नियमानुसार प्रवास भत्ता, बैठक भत्ता व मानधन अनुज्ञेय राहील. यासाठी होणारा खर्च महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ , दादासाहेब फाळके चित्रनगरी, गोरेगाव, मुंबई यांनी त्यांना योजनेंतर्गत मिळणाऱ्या सेवाशुल्कातून भागवावा,

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२५०४०७१६५३२८७३२३ असा आहे. सदरचे आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ANIROODHA SURYAKANT DESHPANDE

Digitally signed by ANIROODHA SURYAKANT DESHPANDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=d34fa92fd12dd57b9647dbd172129b5c0eb8b1cd7ff442b98831311214458302, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=0D09B1312327B281B742D56CD04EE1899269D4FAAF88991AC3364BDCC437CF37, cn=ANIROODHA SURYAKANT DESHPANDE
Date: 2025.04.07 16:55:46 +05'30'

**(अ. सू. देशपांडे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत:**

१. मा. मंत्री, सांस्कृतिक कार्य विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. अपर मुख्य सचिव, सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ मर्यादित, मुंबई
४. उपसचिव (सां.का.१), सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. श्री. प्रमोद पवार, अशासकीय सदस्य
६. श्रीमती तृप्ती भोईर, अशासकीय सदस्य
७. श्री. आदिनाथ कोठारे, अशासकीय सदस्य
८. श्री. ऋषिकेश जोशी, अशासकीय सदस्य
९. श्री. दीपक करंजीकर, अशासकीय सदस्य
१०. निवड नस्ती